महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय वित्त आणि विकास महामंडळास सन २०१९-२० या आर्थिक वर्षाकरीता ३६, सहायक अनुदाने (वेतन) निधी वितरीत करण्यास मंजूरी देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**इमाव, सावशैमाप्र, विजाभज व विमाप्र कल्याण विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक- इमाव-२०१९/प्र.क्र.६४/महामंडळे**
**हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.**
**दिनांक :- ०४ डिसेंबर, २०१९**

**वाचा :** १) शासन निर्णय, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण विभाग क्रमांक इमाव-२०१९/प्र.क्र.६४/महामंडळे, दि.२०.६.२०१९.
२) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दि.०८.०७.२०१९.
३) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय वित्त आणि विकास महामंडळ मर्या. यांचे पत्र क्र.इमाविवि/२०१९-२०/लेखा/६२५, दि.२५.११.२०१९.

## शासन निर्णय

सन २०१९-२० या आर्थिक वर्षाकरिता महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय वित्त आणि विकास महामंडळास ३६, सहायक अनुदाने (वेतन) साठी रु.१०,२९,५८,०००/- इतकी अर्थसंकल्पीय तरतूद करण्यात आली आहे. सदर तरतूदीमधून संदर्भ क्र.१ येथे नमूद दि.२० जून, २०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये रु.३,४३,१९,०००/- इतका निधी वितरीत करण्यात आला आहे. तसेच, या शासन निर्णयान्वये माहे ऑगस्ट, २०१९ ते माहे डिसेंबर, २०१९ पर्यंतचा खर्च भागविण्यासाठी संदर्भ क्र.२ येथे नमूद दि.०८ जुलै, २०१९ रोजीच्या परिपत्रकाप्रमाणे एकूण मंजूर अनुदानाच्या ६० टक्केच्या मर्यादेत रु.२,७४,५५,८००/- (रु.दोन कोटी चौऱ्याहत्तर लाख पंचावन्न हजार आठशे फक्त) एवढे सहायक अनुदान खालील अटींच्या अधीन राहून वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

१. योजनांतर्गत निधीतील खर्चासाठी शासनाने ठरविलेले निर्बंध काटेकोरपणे अंमलात आणावेत. तसेच, ज्या योजनेसाठी निधी मंजूर करण्यात आला आहे, त्याच योजनेसाठी निधी खर्च करण्यात यावा.
२. व्यवस्थापनावरील खर्च मर्यादित ठेवण्याच्या दृष्टीने कामकाजात सुसूत्रता आणावी.
३. विविध बाबींवर खर्च केलेल्या रकमांची तपशीलवार माहिती व त्यावर केलेला खर्च याची सविस्तर माहिती शासनास सादर करावी.
४. कार्यालयीन खर्चात काटकसर करावी.
५. महामंडळाने कर्जाच्या वसुलीचे प्रमाण प्रभावीपणे राबविण्यासाठी प्रयत्न करावेत.
६. सदर योजनेचा निधी उपयोगिता प्रमाणपत्रे तपासण्याच्या अधीन वितरीत करण्यात येत आहे.
७. उपरोक्त निधीचा खर्च करतांना संबंधित अधिकाऱ्यांनी सर्वसाधारण वित्तीय नियम, योजनेच्या अटी व शर्ती, CVC मार्गदर्शक सूचना, CAG निरीक्षणे इ. अनुपालन करून निधीचा विनियोग करावा.
८. संदर्भ क्र.२ येथे नमूद दि.०८ जुलै, २०१९ रोजीच्या परिपत्रकातील प्रत्येक अटींची पूर्तता महामंडळाकडून करण्यात यावी.
९. शासनाव्दारे देण्यात येणारे वेतन अनुदान लाभार्थ्यांच्या बँक अकाऊंटमध्ये ECS व्दारे प्रदान करणे बंधनकारक राहील, कोणत्याही परिस्थितीत वेतन अनुदानाची रक्कम एकत्रितरित्या व offline पध्दतीने वितरीत करण्यात येऊ नये.

२. वरील अनुदानाबाबत सह सचिव/ उप सचिव (अर्थसंकल्प), इमाव, सावशैमाप्र, विजाभज व विमाप्र कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई हे नियंत्रक अधिकारी राहतील. सदर अनुदानाची रक्कम आहरित करण्यासाठी, कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), आहरण व संवितरण अधिकारी, इमाव, सावशैमाप्र, विजाभज व विमाप्र कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई यांना घोषित करण्यात आले आहे. त्यांना सदर अनुदान म.को.नि.४४ मधील नमुन्यातील देयकान्वये महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय वित्त आणि विकास महामंडळास संवितरीत करण्याचे अधिकार देण्यात येत आहेत.

३. या बाबीवरील खर्च मागणी क्र. झेडजी-३, २२२५, अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण, ०३, मागासवर्गीयांचे कल्याण, १०२, आर्थिक विकास, (०३) स्वयंसेवी संस्थांना सहायक अनुदान (०३) (०१) महाराष्ट्र राज्य इतर मागास वर्ग वित्त व विकास महामंडळाला सहाय्यक अनुदान (अनिवार्य) (२२२५ ई ८५७), ३६, सहायक अनुदाने (वेतन) या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकून सन २०१९-२० या आर्थिक वर्षाच्या मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दि. ०८ जुलै, २०१९ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारांतर्गत निर्गमित करण्यात येत आहे.

५. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९१२१०११३८३९१९२२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAVINDRA VASANTRAO GURAV

Digitally signed by RAVINDRA VASANTRAO GURAV
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=0030b22364370f4d96ab251b7263219586c0069b661c3f9cd6fd67e55000ce92, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=9dfb7aefbd9e82b129c324d567b46e1d853d93c38d6e222c868eac72ecd12784, ou=VJNT OBC AND SBC DEPT, o=GOVERNEMENT OF MAHARASHTRA, cn=RAVINDRA VASANTRAO GURAV
Date: 2019.12.10 11:44:37 +05'30'

**(रविन्द्र गुरव)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत :**

१) सह सचिव /उप सचिव (अर्थसंकल्प), विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई.
२) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य इतर मागास वर्ग वित्त व विकास महामंडळ मर्या., मुंबई.
३) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखापरिक्षा/लेखा अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.
४) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे.
५) निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई.
६) वित्त विभाग (कार्यासन व्यय-१४/अर्थसंकल्प-३/साउ) मंत्रालय, मुंबई.
७) सह संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, मुंबई.
८) कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) निवडनस्ती (महामंडळे)

*****